# हत्ती

## शूटिंग १

१.

मला कुठल्याही गोष्टीचा डेड एन्ड लगेच कळतो,
कदाचित मृत्यू
माझ्या रक्तात आहे

२.

तुम्ही नेहमीच मरता,
त्यात नवीन काय आहे?

३.

चक्रधराच्या दृष्टान्तातील हत्तींनो, बुद्धमातेच्या स्वप्नातील हत्तींनो,
फिक्शनमधल्या हत्तींनो, वीरप्पनने मारलेल्या हत्तींनो,
डिस्कवरी वगैरे वगैरे चॅनेलवरील हत्तींनो, फोटोतील हत्तींनो,
पार्वतीपुत्राला जिवंत करण्यासाठी कामी आलेल्या हत्तींनो,
पायदळी द्यायला भाग पाडल्या गेलेल्या हत्तींनो, हस्त नक्षत्रातल्या हत्तींनो,
युद्धातल्या हत्तींनो, मिरवणुकीतल्या हत्तींनो,
रस्त्यावर भीक गोळा करून पोट भरणाऱ्या हत्तींनो,
सर्कसमधल्या हत्तींनो, निवडणूक चिन्हातल्या हत्तींनो, पिवळ्या हत्तीतील हत्तींनो,
लोगोतल्या हत्तींनो, साठमारीतल्या हत्तींनो,
फेस्टिवलमधल्या हत्तींनो, प्राणिसंग्रहालयातल्या हत्तींनो,
जंगलातल्या हत्तींनो, शहाणपणाचं चालतं बोलकं प्रतीक असणाऱ्या हत्तींनो,
ढगातल्या हत्तींनो, पेन्टिंगमधल्या हत्तींनो,
अश्वत्थामा हे नाव धारण करूण माणसांना माणसांच्या गुरूंना कन्फ्यूज करणाऱ्या
युधिष्ठाराला खोटं बोलायला लावणाऱ्या हत्तींनो,

पोसता येत नाही अशा पांढऱ्या हत्तींनो,
सुईतून आरपार जाऊनही शेवटी शेपटीत अडकलेल्या हत्तींनो,

४.
मी एक अख्खा हत्ती भाड्यानं घेऊन
हत्तीत जाऊन राहतो

एनी ऑब्जेक्शन?

५.
मी माझ्या काळ्या रंगाचे रहस्य एकदा आईला विचारलं,
तर आई म्हणाली–
''मागील जन्मी तू हत्ती होतास''

६.
बाप, हत्तींना 'मायनॉरिटीत चाललेलं शहाणपण' म्हणायचा
बहीण 'आदिवासी'
भूषण, 'हत्ती' म्हटलं की 'जुना राजवाडा' इतकंच म्हणायचा
आता तिथं पोलिस स्टेशन आहे
हे आपलं उगाचच!

७.
भारत हा हत्तींचा देश आहे अशी गैरसमजूत असलेला एक फॉरेनर,
त्याला वाटायचं, भारतात रस्तोरस्ती, गल्लोगल्ली हत्ती
तो निराश झाला, जाताना म्हणाला...

''हत्तीची अवाढव्यता सोडली, तर हत्तीचं तुमच्याजवळ काय आहे?
तुम्ही लोक असे,
पैशासाठी हत्तीसुद्धा फुंकाल''

## शूटिंग २

१.
आरण्याचं सर्फिंग करत तुम्ही चाचपत चाललाय,
तुमची होलसेल भूक भागवेल असं होलसेल पॅकेज

तुमचा नॅचरल माऊस
ज्यावर बसून तुम्ही शहाणे होता गणपतीइतके
सोडतोय आमच्या कॅमेऱ्यात, तुमच्या अन्नशोधाचे शाकाहारी पुरावे
तुमच्या डोळ्यांचे टॉर्चेस अचूक वाचतात ह्या आरण्यातले अंधार आणि उजेड
तुम्ही मैल न मैल वाचत चाललाय अशा प्रदेशाकडे,
जिथे गवताचा परमेश्वर तुमची पोटपूजा सांभाळेल!

भूक
तिच्यामागे तिचे चरित्र सोडत नाहीये,
चारित्र्य
स्वभावानुसार बदलतंय

माझ्या आसपास तुमच्या मानवी चारित्र्याच्या प्राणिज दंतकथा सळसळतायत...
तुमच्या दातासाठी चाललेला मानवी खटाटोप
मानवाचे चरित्र आहे की नाही
मला कळत नाहीये

काही न कळताच मी चाललोय, मी चाललोय...
मी जाईन तिथे उगवतायत
दोन खऱ्याखुऱ्या गोष्टी
भक्ष्य आणि शिकारी
पाणी आणि पाणीरी

एक समग्र बोंब उन्हाची माझ्यावर आदळतीये

तुमच्या देहाचा गॉथिक शिल्पपणा
ठेंगू करतोय माझ्या हातातील कोकोकोलाची मल्टिनॅशनल बॉटल

बोट लावीन तिथं उंगल्या करणाऱ्या ह्या सूक्ष्मजीवी काळात
तुम्ही जोपासताय
पृथ्वीच्या अवाढव्य निर्माणक्षमतेच्या शेवटचा जैविक अंश
कुणालाही कसलाही दंश न करता

तुम्ही अन्न शोधत चाललाय...
आणि तुमच्या पाठलागाला शूट करण्याचं कार्पोरेट कॉन्ट्रॅक्ट घेतलेला मी,
माझा भाडोत्री कॅमेरा घेऊन
तुमचे भुकेले बीटस्
फॉलो करत
तुमच्या मागे

दीवाना मुझसा नही, इस अम्बर के नीचे
आगे है कातिल मेरा, और मैं पीछे पीछे

२.
आख्खा काळ रिसायकल करतीये ही पृथ्वीची निळीपिवळी मांजर
स्वतःत फिरत
सूर्याभोवती ग्रव्हिटेशनल चक्कर काटत

मलाही मारायचीये पृथ्वीसारखीच टू डायमेन्शल फेरी
स्व आणि सूर्य ह्यांना एकाच नेटवर्कमध्ये बॅलन्स करणारी
पण मी स्वतःभोवती फिरलो की सूर्याभोवती गरगरतो
सूर्याभोवती फिरलो की स्वतःत तरतरतो

एकाचवेळी दोघांना बॅलन्स करणारी पृथ्वीची गणिती युक्ती
काही केल्या माझ्यात फळत नाहीये
आणि मी तिची ती युक्ती कधीतरी फळेल म्हणून
ही असली भाडोत्री कॉन्टॅक्टस पुरी करत
आरण्य झोकत
हिरव्या नशेत

सगळीकडे मॅपींग आहे
आणि अस्तित्वाचा कोड नंबर मात्र ते सर्वत्र असून गुप्त!

३.
संध्याकाळ उतरतीये सिंहेरी रंगाने माझ्या त्वचागृहात
तिचा अनब्रँडेड प्रकाश किती मोकळेपणाने झुळझुळतोय ह्या जंगलात

माझ्या डोळ्यांना होतायत फोटोसेक्सुअल गुदगुल्या
आकाश क्लिकची वाट पहात टीव्हीच्या स्क्रीनसारखे चंचल
माझा कॅमेरा झुममध्ये सुम्म व्हायला आतुर
माझ्या प्रोग्राम्ड मेंदूतील हार्डडिस्कची माकडीण माकडचाळे बांधून नाचायला सज्ज

मला हा क्षण तसाच निर्मनुष्य सोडायचाय
आणि माझ्या आतला माणूस ईश्वराच्या मुसक्या बांधून
पुन्हा पुन्हा त्याला कॅमेऱ्याकडे न्हेतोय

मी त्याला दाद न देता
अनक्लीक्ड
आणि सर्वत्र सत्यम् शिवम् सुंदर!

४.
तुमचे देह अंधुकतेत मिणमिणते होतायत
इतके, की ते डाउनलोड करता करता
माझ्या कॅमेरामनच्या बुबुळाला फोड येतायत

'सर, हा रोमॅण्टिसिझम सोडा'
तो मला माणसात आणतोय, माझा शर्ट हलवत
मी भानावर
माझ्या सत्यम् शिवम् सुंदरमचा झालाय राजकपूरी बल्ल्या
आणि तो जणू कळल्यासारखा तुमच्या सीत्कार

वाळलेल्या झाडावरून पझलगम खेळणारे जीव उडतायत तुमच्या सीत्कारांनी
त्यांच्या पॉवरझोनमध्ये कुणी टॉम कुणी जेरी
पक्ष्यांतरांनी थकलेले पक्षी स्थलांतरानी थकलेले पशू...

ही रात्र ढळणारी ढेपाळत चाललीये सर्वत्र
तहानेनं हताश तुमचे डोळे
आणि आमच्या जीपमध्ये लक्स इंटरनॅशनल
माझ्या त्वचेला एका डिलक्स टाचणीची टोचणी देत

अंग दुखतंय एका विसंगतीत
आणि ते दुखतंय हे फक्त मलाच माहीत आहे

एक दुष्काळ
व्हॅक्युम क्लीनरसारखा अख्खं आरण्य झाडत सुटलाय
आणि आम्ही
मिनरल वॉटर पीत त्याला शूट करतोय!

५.
तुम्ही नाहीसे होत आहात
आणि तुम्हाला माहीत नाही, की तुम्ही नाहीसे होत आहात!

प्रत्येक सिगरेट पॅकवर 'सिगरेट पिऊ नका' अशी स्टॅट्युटरी वॉर्निंग
आणि तरीही पिणारे पितायत
तुमच्या देहावर 'हत्ती मारू नका' अशी अनविजीबल वॉर्निंग
आणि तरीही मारणारे मारतायत,

प्रत्येक आरण्यात लेगइन' झालेला वीरप्पन
आणि तुम्ही ह्युमन स्मगलिंगच्या ड्रेनेज सिस्टिममधून वहात जगभर
अस्थेटिकली उलथून पडलेले तुमच्या विखुरलेल्या अवयवात

हे आरण्य,
कन्सील्ड वायरीतून सोडतंय एक मरणउदासी
माझ्या मेंदूत
आणि मी तिच्यातून वहात ह्या काळोख्या रात्रीत करतोय
आख्ख्या आरण्याशी चॅटिंग
जे चॅटिंग आहे की चीटिंग कळत नाहीये

झाडं माझ्याशी बोलतायत वाळलेल्या आवाजात
मी पाचोळ्याचे वाचन करत, करतो आहे
माझी इंद्रिये उलटपुलट उलटपुलट

त्यांच्या करपण्याचा खरपूस वास माझ्या अंगाला सुटलाय...
आणि माझे आख्खे युनिट झोपेच्या शहरात
स्वप्ने खरेदी करत मधूनच त्या वासाने दचकत
कास्मोमग्न.

६.
माझ्या ट्राफीकमध्ये वाढलेल्या कॅमेरामनला मज्या येतीये
ट्रॅफिकमुक्त शूटिंग करताना
सडन डेथ देणारा मायक्रोव्हायसरही
उद्दिपीत डोळ्यांनी पाहणारा त्याचा दृश्यासक्तपणा
चष्मा सांभाळत टिपतोय
आरण्याचं लाइव टेलिकास्ट
एकाचं दुःख दुसऱ्याचा तमाशा...

नदी कोरड्या गळ्याने गातीये पाण्याचा अभंग
जनावरांच्या डोळ्यांतून पळून चाललीये धन्यता
कृतज्ञतेचं हिरवं अग्र भिजून पडलेलं...

एक हत्ती कोसळतोय तहानेच्या खोल दरीत
एक स्किझोफ्रेनिक शॉट सळसळत चाललाय लेन्समधून

एक सिडक्टिव सेलिब्रेशन माझ्या आसपासच्या माणसांत
आणि हत्तीच्या मृत्यूनं अतोनात दुःखी माझा रक्तपारा

ह्या असाइनमेंटला आपण मिसफिट आहोत का?
मी मलाच विचारतोय यातना देणारा दक्षप्रश्न

''ही एक कमर्शिअल असाइनमेंट आहे डिरेक्टरसाहेब,
हे आरण्य आपल्यासाठी एक सेट आहे

ही जनावरं निव्वळ आर्टिस्टस
आणि हा हत्तीचा मृत्यू एक हॅपनिंग''

कॅमेरामन कमर्शिअल टोन देत, सांभाळतोय माझा बॅकबोन
आणि मी माझ्या रक्ताच्या उडत चाललेल्या शहाणपणात हताश...

माझं आरण्य वाचण्याचं रीडिंग शून्यावर घसरत चाललंय
आणि मी माहीत नसलेल्या झाडांची दखलही न घेता, गो अहेडची
सुलभ आज्ञा देतोय...

माझी कविता खोलवर दुखावली गेलीये
आणि मी कवितेच्या गावचाच नाही असं दाखवत, भग्न डोळ्यांनी आत्मसंतापात

नॅचरल शॉकचीही जिथे पर्वा नाही
तिथे कवितेचा कल्चरल शॉक काय कामाचा?
मुर्दाडपणाच्या सॉफ्टवेअरमध्ये जिथे करतोय जो तो स्वतःला सेव
तिथे तुमच्या मरण्याने हळवे होत जगण्याचा उपक्रम काय कामाचा?

मला माहीत आहे
ह्या हत्तीनंतर
माझाच नंबर आहे
आणि मी
माझा ब्रँड अमर असल्याच्या खोट्या थाटात
नष्ट होत चाललेलं तुमचं अस्तित्व
डिजीटल फिल्डिंग लावून
फिल्ममध्ये अमर करत चाललोय

अमर?

७.
ज्यांना पॉजता येत नाही, त्यांनी नको पॉजायला
पण ज्यांना कॉस्मो एसीतही रिवर्स करता येतात स्वतःची मुळं...
स्वतःच्या हातात घेऊन

किमान त्यांनी तरी
झाडांनी नाहीसं होताना केलेला गलबला ऐकत
ह्या आरण्यात एक अस्तित्व पॉज घ्यायला काय हरकतंय?

मी आरण्यभर विचारत चाललोय माझ्या युनिटला लांबलचक प्रश्न
आणि युनिट...
"सर, आप गाँव से हो ना इसिलिए इतने सेन्टिमेन्टल हो' म्हणत
माझ्यावर नाराज!

"अरे, उस चुतिये श्रीधर को समझाओ
ये हाथी कोई उसके सगे नही है
साला, खाला पिली दिन बढा रहा है
डेथका फूटेज मिला और क्या चाहिये?"

आख्खं कल्चर व्हीलचेअरवर बसलंय
आणि माणसे वेगाच्या नुसत्या कल्पनेनं भारावून गेलेली.

८.
सूर्य, टायटन घड्याळ न वापरताच वेळेवर उगवतोय
पक्षी रेबॅन गॉगल न घालताच परफेक्ट उडतायत
हत्ती कॅटवॉक न शिकताच मस्त सरकतायत

अचानक येतीये सरकत
सिंहाची अनपेक्षित झुण्ड
थेट कॅमेऱ्याच्या छाताडात
अवघतीये माझ्या अंगभर
भीतीची लहर थंड

कोकोकोला घरंगळत थेट मातीत
हे तर स्पॉन्सर्ड नव्हते पुरवलेल्या माहितीत
आखलेला कॉर्पोरेट प्रोग्राम वाकडातिकडा होत थेट जंगलाच्या कायद्यात

ह्या आरण्यात हे सिंह आले कुठून?
हे आरण्यातले की 'झू' मधून पळून आलेले?

पण दुष्काळाकडे कोण स्वतःहून पळून येतंय?
की दुष्काळी स्वातंत्र्य सुकाळी 'झू' पेक्षा प्रिय आहे?
शॉक कोंबड्यासारखा आरवलाय प्रत्येकाच्या डोळ्यांत
माझी गन जीभ बाहेर काढून हत्येच्या चटावात...
मेलो तर मेलो
पण तीनचार मारूनच मरू!

तुमचा एलिफंटी मेगामॉल सरकत चाललाय एका धीम्या लगबगीत
सिंहिणी भुकेल्या डोळ्यांनी पाहतायत अनब्रेकेबल भक्ष्य

सिंह आणि तुम्ही
आम्ही माणसे तुम्हा दोघांच्यांही खिजगणतीही नाही
तुम्ही दोघांनाही माहीत नाही
तुम्हा दोघांनाही ह्या सिच्युएशनमध्ये उभे करणारे आम्ही आहोत

सीन लिहिला गेलाय,
आणि तुम्ही आता फक्त परफॉर्म करणार आहात
सिंहिणींना दिसतोय फक्त एक हत्ती
हप्त्याहप्त्याने खाता येईल असा

त्या अंदाज घेतायत- एलिफंटी मॉलचा
आणि तुम्ही भक्ष्य म्हणून, आपण कुणाच्या डोळ्यांत भरलोय
ह्याचा कसलाही अंदाज न येऊन दुडक्या चालीने सरकताय

९.
अवघे आरण्य म्यूट
आमची गाडी विव्हळतीये अचानक ज्याम झालेल्या ह्या जंगली ट्राफिकमध्ये...
अवघी झुंड सायबरपंक झाल्यासारखी

तुमच्यातील एक हत्ती रेंगाळणारा
एखाद्या प्रवाशानं नको असलेले लगेज मागे सोडावं तसा...

सिंह एकमेकाला ॲडजस्ट करत टाकतायत पोटाला जस्टिस देणारा ॲक्शनपॅक्ड डाव

मी 'आ' वासून पाहतोय खाना खजाना
सिंह सगळे सबवेज ज्याम करत घालतायत घेराव...

हत्ती दाद न देता उधळू पाहतोय जाळ्याचा फास
सिंह क्षणभर ब्रेक दाबत देतोय चेक
घेतोय पंजाचा एक्सलेटर दाबून थेट पाठीवर उडी
मी माझ्याही नकळत
आख्खा हत्ती नष्ट होणार म्हणून
त्याला वाचवण्यासाठी टाकतोय माझी मध्ये गाडी

''अरे, तिकडे जा त्या साइडला...''
मी दाखवलेली सेफ दिशा हत्तीला कळत नाहीये
तो दिवस भरल्यासारखा
नेमका डिलिट होण्याच्या दिशेनं
त्याचं पॉवरपॅक्ड धूड कोसळतंय सिंहाच्या शक्तिमान दाबात
आणि सिंहिणी त्याला रीचार्ज होण्याची कसलीही संधी न देता,
भुकांचं नेटवर्क बांधत तुटून पडतायत...

१०.
हत्ती खाल्ला जातोय मॅकोडोनल्डच्या बर्गरसारख्या
एका जंगली न्यायात
एक सिंह खातोय त्याचे पोट
एकेक सिंहिण फस्त करतीये त्याचा एकेक अवयव
भुकेने आंधळे झालेले त्यांचे दात
आकांतानं पिंजतायत एक रक्तरंजित रहस्य
जे माझ्या श्वासांना गवसून दृष्टांत होण्याआधीच
त्यांच्या पोटात अन्न होऊन, नाहीसं होतंय...

भक्ष्य आणि भूक
लक्ष्य आणि हूक
ना चूकभूल देणेघेणे
ना काउंटर सोडताना पैसे व लगेज तपासून घ्या

सगळा मामला आज रोख उद्या उधारचा

मला लागलीये अनेपक्षित प्रचंड भूक
आणि मी चाललोय स्वतःला ड्राइव करत
तुम्हाला असं भक्ष्य म्हणून शूट करणाऱ्या कॅमेऱ्याच्या मिश्या पिळत
स्वतःच्या कार्पोरेट अन्नाच्या दिशेनं...

## शूटिंग ३

१.
कळत नव्हतं तेव्हापासून तुम्ही मला क्लिक झाला
माझ्या आयडेंटिटीचे तुम्ही देवक
माझ्या कॅमेऱ्याचं पहिलं प्रेम

२.
जगात खरे प्रकार दोनच
मखना आणि दंती
मेरे प्यारका रस जरा चखना
मेरा दिल तेरे पास ही रखना
ओ मखना, ओ मखना
मला दात आहेत आणि
माझ्या विषयीच्या दंतकथा 'मखना' आहेत

३.
सगळ्या बायका तुमच्याच माधुरी चालीने का चालतात

४.
कधीपासून माहीत नाही
पण मी तुमच्यातून प्रवास करतोय

ट्रेन असो वा बस
मी प्रवासासाठी पाऊल ठेवलं, की ती तुमच्यासारखी होते...

माझ्या पायाला झालाय हत्तीरोग
आणि मी इंडियापासून आफ्रिकेपर्यंत तो पायात वागवत हिंडतोय

माझ्या त्वचा वहात कित्येकदा पोहचल्यात तुमच्या काळ्या किनाऱ्यावर
माझे डोळे तुमच्या सौंदर्यावर खिळून आहेत!
शहरांनी मारलेले खिळे खाऊनही

माझं नाक तुम्हाला हुंगून हुंगून सोर्डेसारखं झालंय
आणि माझा कान भाषेला वारा घालण्याइतका मोठा झालाय

मी हुबेहूब दिसतोय तुमच्यासारखा
आणि माझ्या क्लोन्सचा कळप मिरवत
मीही बिनधास्त ह्या पृथ्वीवर हिंडतोय

माझे शहाणपण तुमच्यासारखेच सामूहिक आहे

५.
तुमच्याभोवती सर्कल मारून एक सर्कस सरकतीये
तुमच्यावर कोसळतोय ॲसीड रेन
तुमची पुढारीण तप्त होतीये काळ्या पाण्यात
हत्तींनाही पिंजून काढणारे रिंगमास्टरचे अमानुष हात
कुठलीच दंतकथा बंद नाही करू शकत तिच्या दुःखाची दाढदुखी
एका गाढ स्वर्गात सगळे झोपी गेलेत
आणि कुठून ह्या नरकात येऊन पडलो, म्हणून अस्वस्थ झालेले तिचे प्राणीज शहाणपण,
स्वतःतच फेऱ्या मारतंय
ती रिंगमास्टरचा एक्स रे काढतीये
आणि तिला त्यात प्रेम नावाचे काहीच आढळत नाहीये

एका हल्ल्याची आग तयार होतीये
आणि रिंगमास्तर स्वतःच्याच रिंगेत बर्फमग्न

आरसा फुटतोय तटकन, पाऱ्याने फुगून
आणि चेहरा तुटून पडतोय समोरच्या हत्तीभक्षक माणूसपणावर

माझा क्लोन; जो रिंगमास्टर होता, मेलाय!
आणि तुम्ही सर्व तिला फॉलो करत, सैरावैरा मला शोधताय...

६.
तुम्ही हल्ले का करता?

७..
आख्ख्या कर्नाटकभर पसरलेली तुमची द्राविडी जादू
हे गाव स्वतःच्या अशिक्षित छातीवर तुमची मोहर मिरवतंय गोदणखरी

रात्रीजवळ सूर्याचा दगड नसतो
तिच्या डोक्यावर असतं फक्त छत
आणि वारेमाप सरकत जाणारं ताऱ्यांचं शेत

आम्ही दोघं रस्त्यावर पावलांची थाप मारत डफाळत चालतोय
आणि कसलाही सुगावा लागू न देता तुम्ही आमच्या मागोमाग

तुमची अवाढव्य पावलं साउंडलेस...
मी उडवला गेलोय तुमच्या सभ्य लाथेनं, फुटबॉलसारखा
आणि तुम्ही मच्छरासारखे चिरडून निघून गेलाय
माझ्यासोबत असलेल्या माझ्या क्लोनला,

हा खून आहे की अपघात
कळत नाहीये
आणि मी माझ्या शहाणपणात कोसळत चाललोय!

तुमच्या लैंगिक गंधाचा मस्तीर दरवळ चालून येतोय,
माझ्या क्लोनच्या शेवटच्या श्वासात...
आणि तो नाकाचा शेवटचा अदमास घेत
तुमच्या मस्तीत नाहिसा होत चाललाय

८.
एक मखना लढतोय एका दंतीशी
प्रेम हे भांडणच लावतं दोन नरात; जेव्हा मादी एक असते
एकमेकाचा हिरोशिमा करण्यासाटी धडकतायत तेवर

तुमच्या ढुर्शींना काय म्हणतात, मला माहीत नाही...
पण ज्याला दात नसतात
त्याला अधिक आक्रमक व्हावं लागतं प्रेमात
एवढं मला कळतंय ह्या लढतीत

मखना आक्रमक आक्रमक होत
पराभूत झालाय दंतीकडून
आणि दंती मादीचे दात घासत मदमस्त विजय साजरा करतोय

काही वेळाने अंधार गडद होईल
आणि पराभूत झालेला मखना आणखी एका मनुष्याला उडवेल

९.
माजावर आलेले तुम्ही मस्त हत्ती
आणि
माजावर येऊन निसर्गालाही स्वस्त समजणारी मनुष्याची हस्ती

सरळ जाण्याचे दिवस संपुष्टात आलेत
आणि तुम्हाला वाकडे पाऊल टाकण्याची विद्या अवगत नाहीये!

१०.
माणसं जंगल कापत, शेतीची चादर अंथरत चाललेत
आता त्या चादरीवर तुम्हा हत्तींनी येऊन काय फक्त झोपावे?

११.
अन्न कुणाला नकोय?
अन्न हेच परब्रह्म

इतका वेदान्त तर तुम्हा हत्तींनाही अवगत आहे!

१२.
तुम्ही हल्ले करताय
तुम्ही हत्ती हल्ले का करताय?

१३.
बॉम्ब टाकणारे बॉम्ब टाकून जातात
बॉम्बनंतर उरतात ते जळलेले प्रदेश
कुजलेली माणुसकी, सजलेली प्रेते
नासलेले विनाश

तुम्ही, आम्ही लादलेली युद्धे सोसत रणरणताय त्या जंगलात
ज्यांची आम्ही निर्लज्जपणे रंणागणे केली

सगळे गणपती रणांगणपती होतायत
आमचं धड तुम्हाला जोडण्याचे सोयीस्करपणे विसरत आम्ही
गणेशोत्सव साजरे करतोय

इकडे पाणी खराब
तिकडे जंगल आणि तुमचे दोन तुकडे

इतकं डफ्फर विसर्जन कुणीच पाहिले नसेल कुठल्या शतकात!

१४.
ऐंशी हत्तींचा कृष्ण-गजरा माळून
एक मादी येतीये
आमच्या शेताच्या दिशेनं

४०० पौडांची भूक कान तीक्ष्ण करत,
वार्षिक पिकाचा जामानिमा घेतीये

फन्ना उडणाराय

कमीतकमी श्रमात भोजन करण्याची ही संधी कोण सोडणाराय?

आख्खं शेत पोटात दळलं जातंय

आम्ही तुमची वनं काटली, तुम्ही आमची शेतं...
हिसाब बराबर हुआ!

तुम्ही निघून चाललाय आमचे डोळे तुडवत, आमच्या नकली गोळ्यांना घाबरून
आणि आम्ही उद्या पुन्हा हाच खेळ का च्या प्रश्नचिन्हात
हवालदिल पायांनी उभे

१५.
'आपण माणसाला मारू शकतो'
जनावराला ही जाणीव झाली की जनवारे माणसापुढे सहज होतात

तुम्ही उद्या सहज होऊन याल?

१६.
स्तनातून वाहतंय विष आणि दूध- एकाच वेळी
शेतातून उगवतंय पीक आणि आत्महत्या- एकाच वेळी
ढगातून पडतंय पाणी आणि नाणी - एकाच वेळी
पृथ्वीला वाटतंय ती माता आणि रांड - एकाच वेळी

उत्क्रांत होत पायांनी बसवलाय सर्वत्र माणूसपणाचा टायर
त्वचा बुटात शिरतीये
आणि बुटेबल होत ग्लोबल होतीये

संगणकात तुम्ही रेखासारखे खुबसूरत
प्रत्यक्षात जंगलात आहात, की नाही आहात?
कुणाला पडलंय?
डोळे संगणकसंतुष्ट
आणि हातांना, गळ्यांना तुमची इनफ आरती

१७.
तुम्ही चालत भुकेचा व्हॉल्यूम वाढवत
तुम्ही मरू नये म्हणून आम्ही झाडतोय कालच्याच नकली गोळ्या
कालच्या अनुभवाने शहाणे झालेले तुम्ही
आपण ह्या नकली गोळ्यांनी मरत नाही हे ओळखून
बिनधास्त, पिकाचा चट्टामट्टा करताय

आतबट्ट्यात चाललेली उपाययोजना टक्क डोळ्यांनी पहात
आम्ही हताश, निरूपाय...

ढगात चाललाय तुम्हाला पिटाळण्याचा एक एक शोर
ढगात चाललाय
आणि तुम्ही माझ्या अंगावर त्याचं पाणी उडवून
खुदुखुदु दुडदुडताय

१८.
ह्या जमिनीवर हक्क कुणाचा?
तुमचा की आमचा...

ही आख्खी पृथ्वी माणसाने स्पॉन्सर केलेली न्यायालय आहे
उलटतपासणीसाठी तुमच्याजवळ भाषाच नाही

कवी हत्तींचे वकीलपत्र घेणारे वकील असतात का?
मला माहीत नाही!

मी तुमची केस मांडतोय
आणि गावकरी स्वतःची पोटं वाजवत
निकाल स्वतःच्या पोटात पाडून घेतायत...

१९.
माणसे जाळ करून बॅटऱ्या लावू तुम्हाला पाहू शकतात
आणि तुम्ही रात्री माणसांना पाहू शकत नाही

ही लढत एकास एक नाही

आम्ही रात्री जाळ पेटवून तुम्हास पळवून लावतोय
आणि तुम्ही आगीच्या पायाचा हा विक्षिप्त प्राणी पाहून
पळून चाललाय!

२०.
हत्ती वाचले पाहिजते - कन्नड ब्ला
हत्तींना महाराष्ट्रात शिरण्यापासून थांबवले पाहिजे- मराठी ब्ला
हत्तींना गोव्यात येण्यापासून आत्ताच रोखले पाहिजे - कोकणी ब्ला

ब्ला ब्ला ब्ला ब्ला
फक्त ब्लफ आणि ब्लफमास्टर्स
कम्युनिकेशनमधून
मास्टरब्यूशन करणारे

२१.
एक ट्रॉमा घेऊन तुम्ही चालून येताय
एक डिसऑर्डर घेऊन तुम्ही चालून येताय
एक भुकेचा राक्षस घेऊन तुम्ही चालून येताय!

आपण अल्पसंख्य होत चाललोय
ह्याचं हे दुःख का?
आपण नष्ट का होत चाललोय
हे स्पष्ट होत नाही
म्हणून मागितलेलं हे स्पष्टीकरण का?

तुमच्या दुःखांना समजून घेणारा बोधिसत्व
कधीच गायब झालाय ह्या कम्युनिकेशनच्या गजबजाटात...

इथे तेच आवाज पोहचतात.
जे मशीनवर टॅप होतात!

भिंती पडतायत, घर उडवली जातायत तुमच्या चालीत

मला लख्ख दिसतंय
तुम्ही त्याच रस्त्यावरून येताहात हुंगत
जिथून आम्ही घसटत आणलं होतं तुमच्या पिलूंचं प्रेत

मातांनो,
मला माफ करा
मलाही कळली नाही त्या पिलाच्या प्रेताची किंमत

तुमचा आकांत आवरा
स्वतःच्या मुलांना परदेशात कसे पाठवता येईल
याचीच काळजी करणारे हे काळीज

तुमच्या दुःखाची ही वीज
ह्या बीज नसलेल्या नेकवर्कर्सना कळणार नाही

मुलाच्या प्रेतासाठीही आकांत करणारे तुमचे सामूहिक डोळे
आणि जिवंत असणाऱ्यांनाही मठ्ठपणे मरू देणारा आमचा हा ग्लोबल कळप

पूल कोसळतायत
आणि त्यांच्या कोसळण्याचा आवाज ऐकू येण्याइतके माझे कान
जंगली राहिलेले नाहीत...

२२.
तुम्ही निघून चाललाय शोकाकुल होउन माणसांच्यातून
तुमचे शहाणपण सोबत घेऊन
आणि माझे सगळे क्लोन्स
कॅमेऱ्यात खुळखुळणारे तुमचे व्हिडीओ शूट पाहत
मठ्ठमग्न!

मीडियातनंच स्वतःला न्याहाळणाऱ्या या जगासमोर श्रीधरनं कवितेचं माध्यम 'इडियट बॉक्स'सारखं उभं केलं आणि एकेका विषयाला बहाल केली एकेका चॅनेलची सत्ता.
एक चॅनेल म्हणजे विश्वाच्या पसाऱ्यातील एक कोपरा. कोपऱ्यातलं एक अस्वतंत्र विश्व. प्रत्येक विश्वाचं आपापलं जीवनदर्शन आहे. प्रत्येक चॅनेल म्हणजे एक स्वतंत्र डोळाच आहे– या जगाला भिडण्याचा. श्रीधरच्या कवितेला असे असंख्य डोळे फुटू लागलेत.
'स्त्रीवाहिनी' आणि 'चॅनेल : अंडर द वर्ल्ड' या दोन संग्रहांनंतरचं 'डिस्ट्रॉयरी' हे तिसरं चॅनेल. जागतिकीकरणात नष्ट होत चाललेल्या गोष्टींचा धांडोळा घेणारं.
तिसऱ्या जगाचा हा तिसरा डोळा अगतिकपणे पाहतोय ईश्वरी जगाचं नश्वरपण. अहिंसेची हत्या होतेय, दहशतीच्या प्रत्येक स्फोटात टोलेजंग मॉला 'मॉल'समोर भली भली भांडारं ठरताहेत खुजी. आपलं एकेरी कम्युनिकेशन सांभाळत पेजर मेलाय आपल्याच मौतीनं. कॉस्मिक बदललं, ऋतुमान आणि मुसळधार पावसानं सगळंच मुसळ केरात गेलं. नदीचे झाले नाले आणि नात्यांची झाली वाफ भुर्रऽऽ हवेत. कवीला जडलं जडत्वगद्य... आणि आंधळ्यांनी पुन्हा केले चक्रधरांच्या हत्तीचे तुकडे हरेक दृष्टांतात. जागतिकीकरणाच्या या दुष्टचक्रात स्वतःसकट गवसलं जगाच्या मूळव्याधीचं मूळ या कवितेला. जगाचं 'सफरिंग' हेच 'हॅपनिंग'च्या थाटात दाखवणाऱ्या या चॅनेलगर्दीत 'डिस्ट्रॉयरी'नं चालवलेली ही 'डिस्कव्हरी' म्हणूनच मोलाची ठरते.

अभिजित देशपांडे

